**राज्यातील सर्व जिल्हा परिषद प्राथमिक शाळांना किशोर मासिकांचा पुरवठा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१०१/ १८/एसएम-४,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ ऑगस्ट, २०१८.

**संदर्भ** :- (१) महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ पुणे यांचे पत्र क्र.किशोर/वितरण/५१९, दिनांक २१ एप्रिल, २०१८.

**प्रस्तावना**:-

महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे हे विद्यार्थ्यांच्या अवांतर वाचनासाठी किशोर मासीक दरमहा गेली ४७ वर्षे प्रसिध्द करीत आहे. लहान मुलांचे संस्कारक्षम वय लक्षात घेऊन मनोरंजनातून ज्ञानसंवर्धन साधण्यासाठी, मंडळ या उपक्रमाद्वारे विशेष प्रयत्न करत आहे. सन २००१ च्या यादीनुसार सध्या ५३,५८५ जिल्हा परिषद प्राथमिक शाळांना किशोर अंकाचा पुरवठा करण्यात येत आहे. त्यामध्ये २००१ नंतर नव्याने सुरु झालेल्या शाळांचा समावेश नसल्यामुळे त्या शाळा या योजनेपासून वंचित राहत असल्याने सदर शाळांना किशोर मासिकाचा पुरवठा करण्यासाठी निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

राज्यातील सर्व जिल्हा परिषद प्राथमिक शाळांना किशोर मासिकांचा पुरवठा करण्यासाठी सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षापासून ६१,६५७ जिल्हा परिषद शाळांना किशोर अंक वितरीत करण्यासाठी दरवर्षी रुपये ४९,३२,५६०/- ( अक्षरी रुपये एकोणपन्नास लाख बत्तीस हजार पाचशे साठ फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च " मागणी क्र.ई-२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना अर्थसहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने (२२०२ ०१७३) " या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षाच्या मंजूर तरतूदीतून करण्यात यावा.

३. वरील खर्च ज्या बाबीसाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच बाबीवर खर्च करण्यात यावा. तसेच केलेल्या खर्चा बाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharasthra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०८२४१५३४५४६४२१ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2018.08.24 15:42:08 +05'30'

**( स्वाती नानल )**
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

(१) शिक्षण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
(२) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
(३) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे-४,
(४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद,
(५) लेखाधिकारी, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
(६) लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ पुणे,
(७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२ मुंबई / नागपूर,
(८) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई / नागपूर,
(९) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई-३२,
(१०) अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
(११) निवड नस्ती एसएम-४.